# वाळूत लपलेले

पुनर्लेखन: मार्गारेट हॉजेस

चित्रे: पॉल बर्लिंग

कथा वाचक सांगतो, दूर एका देशात, एक व्यापारी राहात होता. तो मालाची खरेदी-विक्री करत फिरत असे. त्याच्याकडे 500 बैलगाड्या होत्या. त्यात तो आपले सामान, बैलांसाठी आणि चालकासाठी चारापाणी व लाकडे लादत असे. एक वाटाड्या त्यांना मार्ग दाखवत असे. त्याच्या शेजारी व्यापाऱ्याचा तरूण मुलगा चालत असे. तो जग बघायला फार उत्सुक होता. व्यापारी स्वत: शेवटच्या बैलगाडीत बसत असे.

एकदा पूर्वेकडून पश्चिमेकडे जाताना व्यापाऱ्याला एक मोठे वाळवंट पार करावे लागले. ती वाळू इतकी बारीक होती की मुलाच्या मुठीतून घसरून खाली पडत होती. वाळू इतकी खोल होती की बैलांचे खूर पावलापावलांवर वाळूत रुतत होते. वाळुच्या या समुद्राने सगळे रस्ते गायब करून टाकले होते. त्यामुळे वाळवंट पार करणे अवघड होऊन बसले होते.

प्रत्येक दिवशी, सूर्य आभाळात वर आल्यावर, वाळू चुलीसारखी तप्त होत असे. त्यावर कुणी माणूस वा पशू चालू शकत नसे. त्यामुळे काफिला वाळवंटातून रात्री प्रवास करू लागला. वाटाड्या उत्तरेकडील ध्रुवतारा आणि पश्चिमेकडील आणखी काही तारे पाहून काफिल्याला मार्ग दाखवू लागला.

एके रात्री, मुलगा वाटाड्याला म्हणाला, "तुम्ही तारे बघून मार्ग कसे शोधता, हे मला शिकायचंय, दाखवा मला."

पण वाटाड्याने त्याला दटावले, "गप्प बस, कोल्ह्याचा बच्चा कुठला! त्रास देऊ नकोस मला."

"निदान ध्रुवताराकडे दाखवा मला," मुलगा म्हणाला.

वाटाड्याने चाबकाने इशारा केला. "तो बघ ध्रुवतारा. आपण पश्चिमेकडे चाललोय. अशावेळी, ध्रुवतारा आपल्या उजवीकडे दिसतो. मी इतर काही तारेसुद्धा बघतो. हे थोडं कठीण आहे. आता तुझ्या वडिलांकडे जाऊन बस. तुझ्या बडबडीला मी कंटाळलोय." त्याने मुलाला बैलगाडीतून खाली उतरवले.

दररोज रात्री, मुलगा वडिलांसोबत काफिल्याच्या शेवटच्या बैलगाडीत बसून प्रवास करत असे. रोज पहाटे, वाटाड्या थांबायचा संकेत देई, तेव्हा चालक त्यांच्या गाड्या वर्तुळाकार उभ्या करत आणि बैलांना मोकळे करत. ते त्या सहनशील जनावरांना खायला-प्यायला घालत. स्वत:साठी भात शिजवायला ते आग करत. ते तंबू उभारत आणि दिवसाच्या उष्णतेपासून बचाव करण्यासाठी बहुतेक चालक त्यात विश्रांती घेत. पण एकदा मुलाने पाहिले की वाटाड्या जागाच होता. तो आपल्या मित्राशी फासे खेळत होता. रात्री जेवणानंतर, वाळू थंड झाल्यावर प्रवास सुरू होई. वाटाड्या बसल्या बसल्या जांभया घेत असे. चालक आग विझवून आणि आपल्या पाण्याच्या पिशवीतील पाणी पिऊन तंबुची घडी करत आणि मार्गाला लागत.

“वाटाड्याला सांगा ना, मला त्याच्यासोबत बसव म्हणून,” मुलाने वडिलांना विनंती केली.

वाटाड्या नकार देत तक्रारीच्या सुरात म्हणाला, “हा मुलगा मला त्रास देतो. त्यामुळे मी माझं काम करू शकत नाही.”

पुढल्या दिवशी, वाटाड्या कुरकुर करत बसला आणि अजिबात झोपला नाही. रात्री जेवणानंतर, तो चालकांना म्हणाला, “उद्या आपण वाळवंट पार करून शहरात पोहोचणार आहोत. आता आपण आपलं ओझं कमी करू शकतो आणि जलद चालू शकतो. पाणी ओतून टाका आणि लाकडं फेकून द्या. त्यांची गरज लागणार नाही आता आपल्याला.”

वाटाड्यावर विश्वास ठेवून चालकांनी बैलगाडीतील लाकडे फेकून दिली आणि पाणी वाळूत ओतून टाकले. रात्र पडल्यावर, वाटाड्याने हात उंचावला, पश्चिम दिशेकडे इशारा केला आणि काफिला वाट दिसत नसलेल्या वाळवंटातून चालू लागला.

वाटाड्या थकून गेला होता. रात्री प्रवास करत असताना त्याला झोप लागली. त्यामुळे बैलांना दिशा दाखवायला कुणी नव्हते. हळूहळू, ते उलट पूर्व दिशेकडे वळू लागले. रात्रभर ते त्याच दिशेत चालत होते.

उजाडण्याच्या आधी, काफिल्याच्या अंतिम बैलगाडीत आपल्या वडिलांसोबत बसलेला मुलगासुद्धा झोपला. पहाटेच्या वेळी, त्याने त्याचे डोळे उघडले. वाटाड्या मोठमोठ्याने ओरडत होता, “थांबा! थांबा!” त्याचा आदेश पुढच्या चालकाकडून मागच्या चालकांपर्यंत पाळीपाळीने पोहोचला.

मुलाने आकाशात बघितले. तारे मावळत होते, पण ध्रुवतारा त्यांच्या उजवीकडे नव्हता. आता तो डावीकडे होता.

“आपण चुकीच्या दिशेत चाललोय!” वाटाड्या ओरडला. “बैलगाड्या उलट दिशेत वळवा! बैलगाड्या उलट दिशेत वळवा!”

चालकांनी बैलगाड्या वळवून रांग केली. मुलाने सभोवती पाहिले तेव्हा त्याला एक विलक्षण दृश्य दिसले. त्याला एका मोठ्या वर्तुळाची सावली दिसली. ते वर्तुळ काठ्यांनी आणि ओंडक्यांनी बनले होते. ते वाळूने झाकले गेले होते. सारी गोष्ट त्याच्या लक्षात आली.

"काल रात्री इथूनच तर प्रवास सुरू केला होता!" मुलगा वडिलांना म्हणाला.

वाटाड्या पळतपळत आला. तो वाळूमध्ये गुडघ्यावर बसला आणि शरमेने आपली छाती बडवू लागला. "चूक झाली माझी! चूक झाली माझी! वाळूने आपली लाकडं आणि पाणी गिळून टाकलंय. पाण्याशिवाय आपण मरून जाऊ. सगळं संपून गेलंय!"

चालकांनी त्यांचे बैल मोकळे केले आणि तंबू उभारले. पण त्यांना आशेचा किरण दिसत नव्हता. पाण्याशिवाय बैल पुढे चालू शकणार नव्हते.

"पाण्याशिवाय आपण सारे मरून जाऊ," व्यापारी मुलाला म्हणाला. "पण आपण हार नाही मानायची. मी येईपर्यंत इथेच थांब."

"बाबा, मीही येतो सोबत," मुलगा म्हणाला. "माझी मदत होईल तुम्हाला."

सकाळच्या गारव्यात ते दोघे वाळुच्या टेकड्यांमध्ये पाण्याचा शोध घेत पायी पायी निघाले. शेवटी, दूर एका दरीत मुलाच्या तीक्ष्ण डोळ्यांनी वाळवंटी गवत बघितले. “बाबा, या गवताच्या खाली पाणी असले पाहिजे, नाही का?” त्याने विचारले. “नाहीतर, गवत जिवंत कसे राहिले असते.”

“खरंय मुला,” व्यापारी म्हणाला. “काफिल्याकडे जा आणि काही बळकट माणसांना घेऊन ये. कुदळीसुद्धा आणा सोबत.”

सूर्य आभाळात बऱ्यापैकी वर आला होता. तरीही मुलगा पळत पळत काफिल्याकडे आला. त्याने वडिलांचा संदेश सर्वांना सांगितला आणि काही माणसांना त्याठिकाणी घेऊन गेला.

व्यापारी आणि मुलगा देखरेख करू लागले. माणसे गवताखालची माती खोदू लागले. खाली माती कडक होत गेली, पण पाणी मिळाले नाही. खोल खड्ड्यातील माणसे घाम गाळत होती. तहानेने त्यांचा घसा सुकला होता. मग कुदळीचा घाव एका खडकावर बसला.

“तर आमच्या कामाचं हे फळ मिळालं!” माणसे ओरडली. “फुकट गेली सारी मेहनत. आपण इथेच मरणार!” त्यांनी निराश होऊन कुदळी फेकून दिल्या आणि काफिल्यात परतले.

पण मुलगा त्या खड्ड्यात उतरला आणि खाली वाकला, ऐकू लागला. “या खडकाखाली पाण्याचा प्रवाह वाहातोय,” त्याने वडिलांना हाक दिली. “मी हातोडा घेऊन येतो.”

मुलगा पुन्हा काफिल्यात परतला. त्याने एक वजनदार हातोडा शोधून काढला. तो घेऊन मुलगा वडिलांकडे धावला. सूर्याच्या प्रखर किरणांमुळे त्याला नीट दिसत नव्हते. तप्त वाळुने त्याचे पाय भाजून निघाले. तो खड्ड्याजवळ पोहोचला तेव्हा त्याच्या वडिलांनी मान हलवली. “मी हा हातोडा नाही चालवू शकणार,” ते म्हणाले. “माझ्यात आता इतकी ताकद नाहीये.”

“मी करतो प्रयत्न,” मुलगा म्हणाला.

पुन्हा तो घसरत खड्ड्यात उतरला. त्याच्यासोबत बरीचशी वाळू खाली गेली. त्याने हातोडा त्याच्या डोक्यावर उचलला आणि पूर्ण ताकदीनिशी खडकावर प्रहार केला. पण खडक फुटला नाही. आता खडकावर खाली पडणारी वाळू साचली होती.

मुलाने पुन्हा एकदा खडकावर हातोडा मारला.

अचानक खडकाचे दोन तुकडे झाले आणि पाण्याचा झोत वर उसळला. पाणी खड्ड्यात वेगाने भरू लागले. मुलगा खड्ड्यातून बाहेर येईपर्यंत खड्डा पाण्याने पूर्ण भरला.

बैल खड्ड्यातील पाणी प्याले. सगळी माणसेही पाणी प्याली आणि या ताज्या, निर्मळ पाण्याने त्यांनी आंघोळही केली. त्यांनी गाड्यांची अतिरिक्त चाके कापून लाकडे जमवली आणि ते जाळून त्यांनी भात शिजवला.

इतर प्रवाशांनाही खड्डा सहजपणे सापडावा म्हणून मुलाने त्या खड्ड्याशेजारी झेंडा फडकवला. वाटाड्या त्याला म्हणाला, “माझ्याशेजारी येऊन बस. आज मी तुला तारे बघून मार्ग कसा शोधायचा, ते शिकवेन.” सूर्यास्त झाल्यावर, मुलगा काफिल्याच्या सर्वात पुढच्या गाडीत जाऊन बसला. काफिला प्रवासाच्या शेवटच्या टप्प्याकडे जाऊ लागला.

तिथे पोहोचल्यावर व्यापारी आणि त्याच्या मुलाने सर्वांना ही कहाणी ऐकवली. आपला माल विकून ते घरी परतले तेव्हा पुन्हा सर्वांना त्यांनी ही कहाणी ऐकवली. अशा तऱ्हेने एका ओसाड जागी खडक फोडून गोड्या पाण्याचा साठा शोधणाऱ्या मुलाची ख्याती त्या वाळवंटी प्रदेशात सर्वत्र पसरली.

समाप्त